तुरुंग प्रशासनाचे आधुनिकीकरण

कारागृहात सी. सी. टी. व्ही. बसविणे.

महाराष्ट्र शासन,
गृह विभाग

शासन निर्णय क्र. एमआयएस-०१९४/१५/[८६]पीआरएस-२,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२. दिनांक- ५ डिसेंबर १९९५.

पहा:- शासन निर्णय, गृह विभाग, क्र. एमआयएस- १०८६/४७/[१३१]पीआरएस-२,
दिनांक- २५. १. १९८९.

शासन निर्णय :- कारागृह प्रशासनाचे आधुनिकीकरण या केंद्रीय अर्थसहाय्यक ७५% २५% योजनेखाली मुंबई मध्यवर्ती कारागृह येथे सी. टी. व्ही बसविणेसाठी रु. १,८००००/- [एक लाख ऐंशी हजार रुपये फक्त] एवढया खर्चास पुढील अटीच्या अधीन राहून शासन या आदेशाव्दारे प्रशासकिय मान्यता देत आहे.

१] यापूर्वी प्रशासकिय मान्यता दिलेली कामे अग्रक्रमाने हाती घेऊन नंतरच प्रस्तावाधीन काम हाती घ्यावे.

२] सदर प्रस्तावासाठी अर्थसंकल्पात योग्य ती तरतूद केल्याखेरीज प्रत्यक्ष काम हाती घेऊ नये.

| | | |
|---|---|---|
| १] कारागृहाचा मुख्य दरवाजा | २ | ३०,०००/-[अंदाजित किंमत] |
| २] अधिक्षकाचे कार्यालय | १ | १५,०००/- |
| ३] कारागृह उपअधिक्षकाचे कार्यालय | १ | १५,०००/- |
| ४] वरिष्ठ तुरुंगाधिकारी कार्यालय | १ | १५,०००/- |
| ५] बंदी बराक[सर्कल] | ५ | ७५,०००/- |
| ६]दवाखाना | १ | १५,०००/- |
| ७] उपहारगृह | १ | १५,०००/- |
| एकूण | १२ | १,८०,०००/- |

यासाठी होणारा खर्च "२०५६ तुरुंग -१०१ तुरुंग -१०१ [एक] मध्यवर्ती तुरुंग ३२ यंत्रसामुग्री व साधनसामुग्री " या लेखा शिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

हा आदेश प्रशासकीय विभाग प्रमुखाना शासन निर्णय वित्त विभाग क्र. विअप्र-१०९२/प्र. क्र. २१३/९२ विनियम दिनांक १. ६. १९९२ अन्वये प्रदान करण्यात आलेल्या शक्तीचा वापर करुन वित्त विभाग व नियोजन विभागाच्या सहमतीने ~~निर्गमित~~ निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

[एस. एम. इनामदार]
कार्यासन अधिकारी, गृह विभाग, महाराष्ट्र शासन.

प्रति,

कारागृह महानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य, पुणे.

कारागृह उपमहानिरीक्षक महाराष्ट्र राज्य, पुणे [मुख्यालय]

कारागृह उपमहानिरीक्षक दक्षिण विभाग मुंबई.

अधिक्षक मुंबई मध्यवर्ती कारागृह, मुंबई.

महालेखापाल महाराष्ट्र-१ [लेखा व अनुज्ञेयता] मुंबई.

महालेखापाल महाराष्ट्र-१ [लेखा व परीक्षा ]मुंबई.

अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.

निवासी लेखा अधिकारी, मुंबई.

नियोजन विभाग -१४११

वित्त विभाग, व्यय-८

निवड नस्ती.